**रस्ते विकास योजना सन २००१-२०२१ आराखडा मंजूरीसाठी छाननी समितीची स्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय, क्रमांक- रवियो-२००९/प्र.क्र.६८/नियोजन-२(सां.)
मंत्रालय, मुंबई. ४०० ०३२
दिनांक- ०१ जानेवारी, २०१०.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने व्हिजन-२१ या प्रकाशनाद्वारे देशातील नवीन रस्ते विकास योजना तयार करण्याबाबत मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. राज्याच्या रस्ते विकास योजना सन १९८१-२००१ मधील उद्दिष्टे, १९९७ मधील सदरहू योजनेचे पुर्नविलोकन व त्यानुसारची उद्दिष्टे, त्या अनुषंगाने दिलेल्या मार्गदर्शक सूचना या सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन राज्याचा सुमारे ३,३०,४०० कि.मी. एवढया लांबीच्या रस्ते विकासाचा नवीन आराखडा तयार करण्यात आला आहे. प्रस्तुत आराखडयास मंजूरी देण्यापूर्वी जिल्हानिहाय नियोजन समितीद्वारा या आराखडयास मंजूरी दिल्यानंतर जिल्हानिहाय आराखडा शासनास प्राप्त झालेला आहे. मात्र प्रस्तुत आराखडा तयार करताना जे उद्दिष्ट निर्धारीत करण्यात आले आहे ते उद्दिष्ट पूर्ण करण्यासाठी लागणारा निधी, त्याची उपलब्धता, त्यासाठी असणारे वेगवेगळे स्त्रोत, त्याच बरोबर अशा रस्ते लांबीच्या विकासासाठी केंद्र शासनाच्या विविध योजनांमधून उपलब्ध करुन घ्यावयाचा निधी, खाजगीकरणांतर्गत रस्ते विकास या बाबींचा साकल्याने विचार करणे आवश्यक आहे. त्या दृष्टीकोनातून जिल्हानिहाय तयार केलेल्या रस्ते विकास आराखडयास अंतिम मंजूरी देण्यापूर्वी या आराखडयाची शासन स्तरावर छाननी होणे आवश्यक आहे. या प्रयोजनार्थ एक छाननी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रस्ते विकास आराखडा सन २००१-२१ मधील दर्जानिहाय प्रस्तावित लांबी, त्याबाबतची आवश्यकता, निधी उपलब्धता, त्या अनुषंगाने सविस्तर छाननी करण्यासाठी छाननी समिती याद्वारे गठीत करण्यात येत असून प्रस्तुत समितीची संरचना खालीलप्रमाणे राहील.:-

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव,नियोजन विभाग | अध्यक्ष |
| २ | सचिव ,ग्रामविकास विभाग | सदस्य |
| ३ | सचिव(रस्ते), सा.बां.विभाग | सदस्य |
| ४ | उप सचिव (रस्ते),सा.बां.विभाग | सदस्य सचिव |
| ५ | निमंत्रित | सर्व प्रादेशिक बांधकाम विभागाचे मुख्य अभियंता, तसेच ग्रामविकास विभागाचे अधिपत्याखालील पंतप्रधान ग्राम सडक योजनेचे मुख्य अभियंता. |

समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:-

१)  रस्ते विकास योजना सन २००१-२१ मधील प्रस्तावित दर्जानिहाय रस्ते लांबीचा अभ्यास करणे.

२)  प्रस्तावित योजनेचे उद्दिष्ट पूर्ण करण्यासाठी राज्य शासनाच्या तिजोरीवर कमीत कमी भार पडेल यादृष्टीकोनातून खाजगीकरणांतर्गत खाजगी उद्योजकांमार्फत रस्ते विकास, केंद्र शासनाच्या पंतप्रधान ग्राम सडक योजनेतून जास्तीत जास्त जिल्हास्तरीय रस्त्यांचा विकास या सारख्या स्त्रोतांचा विचार करुन त्यानुसार प्रस्तावित आराखडा मंजूरीसाठी शिफारस करणे.

३)  राज्य शासनाच्या निधी व्यतिरीक्त जे स्त्रोत मोठया प्रमाणावर उपलब्ध होऊ शकतील अशा स्त्रोतांचा रस्ते विकासाच्या कामासाठी जास्तीत जास्त उपयोग करण्याच्यादृष्टीने प्रकरणपरत्वे प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखडयात बदल सूचविणे.

४)  प्रस्तूत आराखडयातील उद्दीष्टय पुर्तीच्यादृष्टीने तसेच राज्यात रस्त्यांचे जाळे कार्यक्षमपणे पसरविण्याच्या दृष्टीने अस्तित्वातील संविधानिक प्रशासकीय व आर्थिक संरचनेत आवश्यक ते बदल करण्याबाबत समिती शिफारस करेल.

५)  अपेक्षित बदलांसहित व शिफारशींसहीत प्रस्तावित नवीन रस्ते विकास आराखडा शासनाच्या मंजूरीस्तव सादर करणे.

उपरोक्त नमूद केलेल्या रस्ते विकास छाननी समितीने याबाबतची कार्यवाही आदेश निर्गमित झाल्यापासून २ महिन्यांच्या आत पूर्ण करुन नवीन रस्ते विकास आराखडा अंतिम मंजूरीसाठी शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.gov.mahapwd.com.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००१०२१६२६३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अ.ए.कुलकर्णी)
शासनाचे अवर सचिव

प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी :-

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
२. मुख्य अभियंता (पंतप्रधान ग्रामसडक योजना), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे
५. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग / जिल्हा परिषद विभाग

प्रत माहितीसाठी :-

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
५. प्रधान सचिव (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक
६. प्रधान सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
७. सचिव (ग्रामविकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
८. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक
९. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक
१०. उपसचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक